भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर शिक्षण प्रसारक मंडळ नागलगांव तांडा ता.उदगीर जि. लातूर संचलित इयत्ता १ली ते ७ वी प्राथमिक आश्रमशाळा डोंगरशेळकी तांडा ही प्राथमिक आश्रमशाळा रामधन नाईक शिक्षण संस्था बोरतळा तांडा (नागलगाव) ता. उदगीर जि. लातूर या संस्थेस तसेच इयत्ता ८ वी ते १० वी माध्यमिक आश्रमशाळा डोंगरशेळकी तांडा ही माध्यमिक आश्रमशाळा शारदामाता शिक्षण प्रसारक मंडळ, सोमनाथपूर ता. उदगीर जि. लातूर या संस्थेस कायमस्वरुपी हस्तांतरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. विभशा २०१४/प्र.क्र. २२८/विजाभज-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : ०९ सप्टेंबर, २०१४.**

वाचा :-

१) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विभशा-२००७/प्र.क्र.९२/मावक-६ दि. ०१ ऑगस्ट, २००७.

२) संचालक विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र. विजाभजसं/आशा/हस्तांतरण/लातूर/२०१४-१५/१०९४ दि. २५ ऑगस्ट, २०१४.

प्रस्तावना :-

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर शिक्षण प्रसारक मंडळ नागलगांव तांडा ता.उदगीर जि. लातूर संचलित इयत्ता १ली ते ७ वी प्राथमिक आश्रमशाळा डोंगरशेळकी तांडा ही प्राथमिक आश्रमशाळा रामधन नाईक शिक्षण संस्था बोरतळा तांडा (नागलगाव) ता. उदगीर जि. लातूर या संस्थेस तसेच इयत्ता ८ वी ते १० वी माध्यमिक आश्रमशाळा डोंगरशेळकी तांडा ही माध्यमिक आश्रमशाळा शारदामाता शिक्षण प्रसारक मंडळ, सोमनाथपूर ता. उदगीर जि. लातूर या संस्थेस कायमस्वरुपी हस्तांतरीत करण्याबाबतचा प्रस्ताव संचालक विजाभज, पुणे यांच्याकडून संदर्भाधीन दिनांक दि. २५ ऑगस्ट, २०१४ च्या पत्रान्वये

प्राप्त झाला असून सदर आश्रमशाळेचे व्यवस्थापन व प्रशासन चांगल्या पद्धतीने चालावे म्हणून संस्थेच्या स्वेच्छेनुसार या प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा वेगवेगळया सस्थांना शासन निर्णय दिनांक १ ऑगस्ट, २००७ मधील आश्रमशाळा हस्तांरणाबाबतच्या “क्ष” येथील तरतुदीनुसार हस्तांतरीत करण्याचा प्रस्ताव शासननाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर शिक्षण प्रसारक मंडळ नागलगांव तांडा ता.उदगीर जि. लातूर संचलित इयत्ता १ली ते ७ वी प्राथमिक आश्रमशाळा डोंगरशेळकी तांडा ही प्राथमिक आश्रमशाळा रामधन नाईक शिक्षण संस्था बोरतळा तांडा (नागलगाव) ता. उदगीर जि. लातूर या संस्थेस तसेच इयत्ता ८ वी ते १० वी माध्यमिक आश्रमशाळा डोंगरशेळकी तांडा ही माध्यमिक आश्रमशाळा शारदामाता शिक्षण प्रसारक मंडळ, सोमनाथपूर ता. उदगीर जि. लातूर या संस्थेस सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षापासून कायमस्वरुपी हस्तांतरीत करण्यास पुढील अटीस अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळेत कार्यरत असलेल्या मान्यताप्राप्त शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांचे हस्तांतरण नवीन सस्थांकडे वर्ग होईल. मात्र अस्थायी व नियमानुसार पात्र नसलेल्या कर्मचा-यांना नवीन सस्थांकडे हस्तांतरीत होण्याचा हक्क राहणार नाही.

२) सदर प्राथमिक वच माध्यमिक निवासी आश्रमशाळांचे हस्तांतरण ज्या कर्मचा-यांना मान्य नाही अशा कर्मचा-यांबाबत आवश्यक ती वेतनाची भरपाई संस्थेमार्फत देण्यात येईल व त्यांच्या सेवा आपोआप संपुष्टात येतील.

३) शासकीय निधीतून निवासी शाळेसाठी उपलब्ध करुन दिलेल्या मालमत्तेचे हस्तांतरण व दस्ताऐवज नवीन सस्थांकडे हस्तांतरीत करण्यात येतील.

४) सदर प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळेतील निवासी व अनिवासी विद्यार्थ्यांचे प्रवेश कायम रहातील.

५) नवीन संस्थेस हया आश्रमशाळा शासनाच्या धोरणास अनुसरुन चालवाव्या लागतील. तसेच भविष्यात शासनाने घेतलेले निर्णयही त्यांचेवर बंधनकारक राहतील.

६) नवीन संस्थेच्या कार्यकारी मंडळातील सदस्याविरुध्द भा.द. वि. नुसार गुन्हा दाखल नसल्याचे पोलीस अधिक्षक यांचे प्रमाणपत्र त्वरीत सादर करावे लागेल.

७) या हस्तांतरण प्रक्रियेस अनुसरुन नवीन संस्थेस कोणतेही नवीन पद अनुज्ञेय होणार नाही. मात्र पद रिक्त असल्यास त्या रिक्त जागेवर त्या संस्थेतील, जिल्ह्यातील, विभागातील किंवा राज्यातील अतिरिक्त कर्मचा-यांच्या यादीमधून सेवा ज्येष्ठ कर्मचा-यास नियुक्ती देणे बंधनकारक राहील.

८) हस्तांतरीत संस्थांनी आहे त्याच ठिकाणी सदर प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा चालविणे त्याच्यावर बंधनकारक राहील.

९) भविष्यात या हस्तांतरीत संस्थांना प्राथमिक व माध्यमिक आश्रशाळेची मागणी करता येणार नाही तसेच शासनही तशा आश्रमशाळा मंजूर करणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१७३१५५७८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji Sonaji Choure

Digitally signed by Shivaji Sonaji Choure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shivaji Sonaji Choure
Date: 2014.09.10 11:47:15 +05'30'

( शिवाजी चौरे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, ३ चर्च रोड, पुणे -४११ ००१.
२. प्रादेशिक उपायुक्त समाजकल्याण विभाग, लातूर
३. सहाय्यक आयुक्त समाजकल्याण, लातूर
४. महालेखापाल महाराष्ट्र २ (लेखा परीक्षा वा लेखा अनुज्ञेयता) नागपूर.
५. जिल्हा कोषगार अधिकारी, लातूर
६. मा. मंत्री (सा. न्या.) यांचे खाजगी सचिव
७. अध्यक्ष, भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर शिक्षण प्रसारक मंडळ नागलगांव तांडा ता.उदगीर जि.लातूर
८. अध्यक्ष, रामधन नाईक शिक्षण संस्था बोरतळा तांडा (नागलगाव) ता. उदगीर जि. लातूर.
९. अध्यक्ष, शारदामाता शिक्षण प्रसारक मंडळ, सोमनाथपूर ता. उदगीर जि. लातूर.
१०.निवड नस्ती.